केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत आनंदवाडी, ता.देवगड, जि.सिंधुदूर्ग येथील मत्स्यबंदराच्या बांधकामास सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१००८/प्र.क्र.२७५/पदुम-१४

मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२

दिनांक : ९ ऑगस्ट, २०१८

**वाचा -**

१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक मत्स्यवि-२००४/प्र.क्र.१०९/पदुम-१४, दिनांक २२.७.२००४

२) भारत सरकार, कृषि मंत्रालय, पदुम विभाग, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ३३०१३-१/ २०१७-Fy (H), दिनांक २८.३.२०१८

३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांक मत्स्यवि- १००८/प्र.क्र.२७५/पदुम-१४, दिनांक २१.९.२०१५

४) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक मत्स्यवि-१००८/प्र.क्र.२७५/पदुम-१४, दि.४ मे,२०१८

**प्रस्तावना -**

दिनांक ११.६.२००५ रोजी तत्कालीन केंद्रीय कृषि मंत्री यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीमध्ये राज्याच्या कोकण किनारपट्टीवरील एकूण आठ लहान मासेमारी बंदरांचा विकास करण्याचा निर्णय घेण्यात आला असून त्यानुसार आनंदवाडी, ता.देवगड, जि.सिंधुदूर्ग येथे केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत मत्स्यबंदर विकसीत करण्यात येणार आहे. सदर मत्स्यबंदराच्या कामास शासन निर्णय दिनांक २२.७.२००४ रोजी रू.२९.१३ कोटी रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तसेच केंद्र शासनाच्या दिनांक १९.२.२००८ अन्वये रू.३५.८९ कोटी रकमेच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार मत्स्यबंदराच्या कामास सुरूवात करण्यात आली, परंतु स्थानिक ग्रामस्थांनी प्रस्तावित आराखड्यास विरोध दर्शवून काम बंद पाडल्यामुळे सी.आय.सी.ई.एफ. बेंगळूरू या संस्थेने तयार केलेल्या मांडणी नकाशास स्थानिक ग्रामस्थांची सहमती घेण्यात आली. सुधारीत आराखड्यामुळे अंदाजपत्रकीय रकमेत वाढ झाल्यामुळे व्यय अग्रक्रम समितीच्या सहमतीने सदर प्रकल्पाच्या अंदाजपत्रकास सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार दिनांक २१.९.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.९२५०.५० लाख (केंद्र हिस्सा ७५% + राज्य हिस्सा २५%) रक्कमेला सु-सुधारित प्रशासकीय मान्यता दिली आहे. केंद्रीय मात्स्यिकी तटवर्ती इंजीनियरी संस्थान, बेंगलूर यांनी प्रत्यक्ष स्थळ पहाणी करुन सदर प्रकल्पाच्या रु.८८४४.०० लाख इतक्या प्रकल्प प्रस्तावास मान्यता दिली आहे. तसेच केंद्र शासनाच्या दिनांक

२८.२.२०१८ रोजीच्या पत्रान्वये केंद्र हिस्सा प्रकल्प किंमतीच्या ७५% ऐवजी एकत्रित रु.२५००.०० लाख देण्याचे मान्य केले. त्यामुळे या प्रकल्पास रु.८८४४.०० लाख इतक्या रक्कमेची सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता देणे आवश्यक आहे. त्यानुसार दिनांक ४.५.२०१८ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला असून, त्यामध्ये किनारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभागयांनी आवश्यक त्या स्तरावरील ना हरकत परवानगी घेतल्यानंतर कामाला प्रत्यक्ष सुरुवात करावी असे नमुद केले आहे. मात्र सदरचे काम कार्यकारी अभियंता, आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत कार्यान्वयीत करावयाचे असून त्याचबरोबर केंद्र शासनाने ३% आकस्मिक खर्च व २% आस्थापना खर्चास मान्यता दिलेली असल्याने त्यानुसार सुधारीत प्रशासकीय मान्यता देणे आवश्यक आहे.

## शासन निर्णय-

केंद्र शासन पुरस्कृत ७५-२५ योजनेंतर्गत असणारी योजना आता केंद्र राज्य हिश्श्याची भागीदारी बदलल्यामुळे आनंदवाडी, ता.देवगड, जि.सिंधुदूर्ग येथील मत्स्यबंदराच्या बांधकामासाठी खाली नमूद केल्याप्रमाणे रू. ८८,४४,००,०००/- (रूपये अठ्ठयाऐंशी कोटी चवेचाळीस लाख मात्र) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सु-सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाच्या बाबी | रक्कम |
|---|---|---|
| १ | एकूण कामाची निव्वळ रक्कम | रू.८४,२२,८३,०६४/- |
| २ | ३% आकस्मिक खर्च | रू.२,५२,६८,४९२/- |
| ३ | २% सेंटेज चार्जेस (आस्थापना खर्च) | रू.१,६८,४५,६६१/- |
| | **एकूण** | **रु.८८,४३,९७,२१७/-** |
| | **एकूण** | **रू.८८,४४,००,०००/-** |

२. सदरहू काम हे केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत रु.२५.०० कोटी केंद्र शासनाचा हिस्सा व उर्वरित रु.६३.४४ कोटी राज्य हिश्श्यातून तसेच केंद्र शासनाच्या अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात यावे.

३. सदर प्रकल्पासाठी निधीचे स्त्रोत उपलब्ध झाल्यानंतर व यापूर्वीच्या निविदेमध्ये समाविष्ट कामे वगळून नवीन निविदा प्रक्रीया सुरू करण्यात यावी.

४. कार्यकारी अभियंता, आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक त्या स्तरावरील ना-हरकत परवानगी प्राप्त करून घेतल्यानंतरच कामाला प्रत्यक्ष सुरूवात करावी.

५. आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी सदर कामासंदर्भात दर तिमाही बैठक घेऊन कामाचा आढावा घ्यावा व शासनास वेळच्या वेळी प्रगती अहवाल सादर करावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ३७८/१७/व्यय-२, दिनांक १८.०७.२०१७ अन्वये मान्यता दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१८०८०९१२०८४०८९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vijay K. Chaudhari
Date: 2018.08.09 12:15:44 +05'30'

(विजय चौधरी)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ३२
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. प्रधान सचिव (बंदरे),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
४. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. सहआयुक्त (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई
६. किनारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
७. कार्यकारी अभियंता, आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई
८. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
९. पत्तन अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सिंधुदूर्ग
१०.सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, सिंधुदूर्ग
११.महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
१२.सह सचिव, भारत सरकार, कृषि मंत्रालय, पदुम विभाग, नवी दिल्ली.
१३.वित्त विभाग (व्यय-१/ अर्थसंकल्प -१५/ अर्थोपाय / अर्थबळ), मंत्रालय, मुंबई ३२
१४.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
१५.सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६.निवड नस्ती, पदुम-१४

**प्रत माहितीकरीता,**

१. मा.मंत्री (पदुम) यांचे खासगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खासगी सचिव
३. सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक

**प्रपत्र-अ**

**सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकातील तरतूदी**

| अ.क्र. | कामाचा वाव | तांत्रिक मान्यता रक्कम रुपये | |
|---|---|---|---|
| १. | ड्रेजिंग करणे | रु. | ४,४४,०१,२२९.०० |
| २. | रिक्लेमेशन करणे (जमीन पुन: विकसित करणे) | रु. | १५,८८,४७,५२९.०० |
| ३. | रिवेटमेंट फॉर लँड डेव्हलपमेंट | रु. | ३,१०,५२,६८५.०० |
| ४ | जाण्या-येण्याकरिता मार्ग (अंतर्गत प्रवेशासाठी) | रु. | १,६१,५७,७५३.०० |
| ५. | (अ) सीडी. कार्य-वन रो | रु. | २,०७,६४५.०० |
| | (ब) सीडी. कार्य-टू रो | रु. | ११,२१,९४९.०० |
| ६. | आर.सी.सी.क्वे | रु. | ३३,२४,७९,२३९.०० |
| ७. | स्लोपिंग हार्ड | रु. | ६६,८०,५७८.०० |
| ८. | अंतर्गत रस्ता (दुपदरी) | रु. | ३,८१,७५,५२५.०० |
| ९. | कॉंक्रिट पृष्ठभाग रस्ता | रु. | ७३,२८,५०१.०० |
| १०. | डब्ल्यू.बी.एम. पृष्ठभाग (खडीचा रस्ता) | रु. | २,००,९८,७७६.०० |
| ११. | बीच लँडिंग रिव्हेटमेंट अन्ड स्टेप्स | रु. | १६,८८,१४७.०० |
| १२. | मत्स्य लिलाव गृह | रु. | ५,७५,७२,४२९.०० |
| १३. | मत्स्यव्यवसाय प्रशासकीय कार्यालय | रु. | ६०,६५,८३४.०० |
| १४. | फिशरमेन गियर शेड (दोन घटक) | रु. | १,२१,३७,६५२.०० |
| १५. | जाळी विणण्याचे शेड (तीन घटक) | रु. | १,३०,९९,९८९.०० |
| १६. | मच्छिमारांची विश्रांतीगृह (दोन एकके) | रु. | १,२३,१९,६९८.०० |
| १७. | कार्यशाळा (बोट रिपेअरींग शॉप) | रु. | ३१,७१,३४२.०० |
| १८. | उपहारगृह (कॅटींन) | रु. | ४२,९२,८३९.०० |
| १९. | मासे व्यापारी / एजंटसाठी प्रसाधनगृह | रु. | १,४६,९०,५८१.०० |
| २०. | रेडिओ आणि कम्युनिकेशन सेंटर | रु. | ४८,७३,६५४.०० |
| २१. | सार्वजनिक शौचालय ब्लॉक (दोन एकके) | रु. | ६८,६६,२५६.०० |
| २२. | गार्ड हाऊस (रक्षक गृह) | रु. | १२,९१,७७५.०० |
| २३. | कुंपण भिंत आणि वादळाचे पाणी निचरा | रु. | १,३४,६१,४५९.०० |
| २४. | विद्युत पुरवठा आणि विद्युतीकरणासह | रु. | ८५,००,०००.०० |
| २५. | बाहय पाणी पुरवठा पंप आणि भूमिगत पंपासह ताजे पाणी पुरवठा व वितरण | रु. | ६०,००,०००.०० |
| २६. | पंपिंग स्टेशनसह सागरी पाणी पुरवठा व वितरण | रु. | २०,००,०००.०० |

| | | | |
|---|---|---|---|
| २७. | सेप्टिक टँक आणि सेवेरेज लाईन इनक्लुडिंग सेप्टीक टँकसह सीवेज ट्रीटमेंट प्लाँट. | रु. | ६५,००,०००.०० |
| २८. | ग्रीनरी वीथ लँडस्केपींग | रु. | २५,००,०००.०० |
| २९. | अतिरिक्त माती तपासणीसह फिल्ड डेटा संकलन,जलविज्ञान सर्वेक्षण, भौतिक परीक्षण शुल्क आणि तपशीलवार संरचनात्मक रचना | रु. | ७७,००,०००.०० |
| ३०. | पर्यावरण प्रभाव मूल्यांकन आणि परीक्षण | रु. | १०,००,०००.०० |
| | एकूण | रू. | ८४,२२,८३,०६४.०० |
| | ३% कॉटीजन्सी (कार्यालयीन खर्च) | रु. | २,५२,६८,४९२.०० |
| | २% वर्क चार्ज (आस्थापना खर्च) | रु. | १,६८,४५,६६१.०० |
| | एकूण | रु. | ८८,४३,९७,२१७.०० |
| | एकूण | रु. | ८८,४४,००,०००.०० |